# मराठी - तामिळ

# मिनिशब्दकोश

संकलन

कै. सौ. रमाबाई जोशी

# मराठी-तमिळ लघु शब्दकोष

[ व्यावहारिक शब्दकोष ]

: लेखिका :

कै. सौ. रमाबाई जोशी, मद्रास

: प्रस्तावना लेखक :

कै. शंकर नारायण जोशी,

इतिहास-संशोधक, पुणे.

शके १८९६ ]      किंमत रुपये दहा      [ सन १९७४

साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

# द्वितीयावृत्तीसंबंधीं निवेदन

कै. ती. सौ. आईच्या या शब्दकोशाची प्रथमावृत्ति १९६१ मध्यें प्रसिद्ध झाली. पुस्तकाच्या प्रथमावृत्तीच्या मुद्रणाचें काम चालू असतांनाच आणखी कांहीं उपयुक्त शब्द तिला सुचत गेले. ते शेवटीं पुरवणींत घालावे लागले. पुस्तकाच्या प्रसिद्धीनंतरहि, दोन वर्षांपूर्वी झालेल्या तिच्या दुर्दैवी निधनापर्यंत, तिला कोशांत समावेश करण्यासारखे आणखी कांहीं शब्द सुचत गेले, ते तिनें पुस्तकाच्या दोन प्रतींवर आपल्या हातानें लिहून ठेविले. असे शब्द सुमारें २०० आहेत. तसेंच कांहीं शब्दांस तिनें अधिक प्रतिशब्दहि लिहून ठेविले आहेत यामुळें प्रथमावृत्ति संपल्यानंतर दुसरी आवृत्ति केव्हांतरी काढावी लागेल, व त्या वेळीं या शब्दांची भर कोशांत घालतां येईल, असा तिचा हेतु उघड दिसतो.

ती. सौ. आईची आयुर्मर्यादा संपली, जवळजबळ त्याच सुमारास पुस्तकाची प्रथमावृत्ति संपली. म्हणून तिच्या निधनानंतर दोन वर्षांचा काळ लोटल्यावर दुसरी आवृत्ति वाचकांच्या हातीं देतांना मला एक प्रकारें आनंद व एक प्रकारें दुख:हि होत आहे. दु:ख अशासाठीं कीं, लेखिकेला ती स्वत: काढण्याचा योग आला नाहीं. आनंद याचा कीं, गेले कांहीं दिवस पुस्तक दुर्मिळ झाल्यामुळें अनेक मराठी भाषिक बंधु-भगिनींची निराशा होत असे, ती आतां होणार नाहीं.

प्रथमावृत्तींत पुरवणींत समाविष्ट केलेले व लेखिकेनें पुस्तकांत समावेश करण्यासाठीं मधूनमधून लिहून ठेविलेले शब्द या आवृत्तींत योग्य ठिकाणीं घातले आहेत, म्हणून या आवृत्तीची उपयुक्तता निश्चितच वाढली आहे.

या कोशाची रचना ती. सौ. आईनें केली. ती तोंपर्यंत जशी अभूतपूर्व होती, तशी ती अजूनहि राहिली आहे. तमिळ प्रांतांत निवासासाठीं वा प्रवासासाठीं येणाऱ्या ज्या ज्या बंधुभगिनींनी हें पुस्तक घेतलें, त्या सर्वांनीं त्याची मुक्तकंठानें प्रशंसा केली. तसेंच प्रथमावृत्तीच्या प्रसिद्धीनंतर अनेक मराठी नियतकालिकांनीं पुस्तकावर उत्तम अभिप्राय दिले. त्या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहे. त्यांच्या उत्तेजनामुळेंच या दुसऱ्या आवृत्तीचा योग येत आहे.

गेल्या कांहीं दिवसांत छपाईचे दर व कागदाची किंमत यांत खूप वाढ झाल्यामुळें पुस्तकाची किंमत निरुपायाने बरीच वाढवावी लागत आहे. प्रथमावृत्तीचें मुद्रण ज्या लोकसंग्रह मुद्रणालयांत झालें होतें, तेथेंच याहि आवृत्तीचें होत आहे. लोकसंग्रहाचे सध्याचे चालक श्री. का. गं. सोनार व त्यांचे सहकारी यांनीं तें अल्पावधींत, तत्परतेनें व आपुलकीनें करून दिलें, म्हणून मीं त्यांचा आभारी आहें.

मद्रास.
गणेशचतुर्थी, शके १८९६
दि. २१ ऑगस्ट १९७४

**अशोक पुरुषोत्तम जोशी**

# निवेदन

अखिल भारतांत उपयोगी पडणारी सामान्य भाषा म्हणजे आंतरराष्ट्र भाषा हिंदी असें आपल्या राज्यघटनेनें मान्य केलें असलें, तरी प्रांतीय किंवा स्थानिक भाषांचें महत्त्व तिच्यामुळें मुळींच कमी व्हावयाचें नाहीं. किंबहुना भारतास राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर भारतीय भाषांस लागलेलें परकीय भाषेचें ग्रहण सुटलें हें सत्यच होय. भारताच्या एका भागांतील लोक दुसऱ्या भागांत गेले म्हणजे, त्यांचें वास्तव्य तेथें कमीअधिक काळ व्हावयाचें असेल त्याप्रमाणें, तेथील भाषेचा परिचय त्यांनीं करून घेणें हें अवश्य व सोयीचेंहि आहे. केवळ यात्रेकरूंची वा प्रवासी भूमिका असेल तर स्थानिक भाषेवांचून तितकें अडणार नाही. तथापि स्थानिक भाषेचें ज्ञान थोडें असलें तर स्थानिक जनतेंत मोकळेपणानें मिसळतां येतें. ज्यांना अन्य प्रांतांत दीर्घकाळपर्यंत राहावयाचें असेल, त्यांना मात्र स्थानिक भाषेचें ज्ञान जितक्या अधिक प्रमाणांत करून घेतां येईल तितकें त्यांचें वास्तव्य अधिक उपयुक्त व सुखाचें होईल. अनेक भाषांचा व त्या भाषांतील साहित्याचा ज्यांना स्वतः परिचय करून घ्यावयाचा असेल, व तो स्वभाषीयांस करून द्यावयाचा असेल, त्यांनीं त्या भाषेचा सखोल अभ्यास केला पाहिजे. अशांची अल्पसंख्या सोडून दिली, तरी अन्य भाषिक प्रांतांत आपणांस काही काळ राहावयाचें असेल, तर तेथील भाषेचा परिचय जितका अधिक करून घेतां येईल तितका चांगला हें निर्विवाद होय.

भारतीय भाषांचे सामान्यतः दोन गट आहेत. एक संस्कृत व दुसरा द्राविडी. उत्तरभारतांतील सर्व भाषा संस्कृत गटांत येतात व दक्षिणेंतील भाषांची गणना द्राविडी गटांत करावी लागते. द्राविडी गटांतील भाषांतूनहि अनेक संस्कृत शब्दांचा भरणा आहे. त्याचें कारण म्हणजे आपल्या धर्मग्रंथांची भाषा वैदिक किंवा संस्कृत आहे हेंच होय. संस्कृत शब्दांचें उच्चाटन स्वभाषांतून करण्याचे प्रयत्न कित्येक आततायी लोकांनी चालविले आहेत; पण ते फारसे यशस्वी होण्याचा संभव नाही व त्यांचा विचार येथें कर-

ण्याचें कारण नाहीं. मराठी भाषा संस्कृत गटांतील असल्यानें महाराष्ट्रीय मनुष्य उत्तर-भारतांत कोठेंहि गेला, तरी स्थानिक भाषा व्यवहारापुरती समजण्यास त्यास फारशी अडचण पडत नाहीं. इतकेंच नव्हे तर, थोड्या कालावधींत त्यास ती भाषा आत्मसात्‌हि करतां येते. भक्त नामदेव, समर्थ रामदास यांसारख्या महाराष्ट्रीय संतांनीं पंजाबी व हिंदी भाषांतून पद्यरचना केली व आधुनिक काळांतहि कित्येक महाराष्ट्रियांनी हिंदी वर्तमानपत्रें यशस्वी रीतीनें चालविलीं, त्या भाषेंतून उत्कृष्ट ग्रंथनिर्मिति केली, त्याचें कारण हेंच.

द्राविड गटांतील मराठीच्या शेजारणी म्हणजे कानडी व तेलुगु. यामुळेंच कित्येक कन्नडिगांचें व आंध्रांचें महाराष्ट्रीकरण झालें आहे हें आपण पाहतोंच. या दोन शेजारी भाषांचा परिणाम मराठी भाषेवर झालेला आपणांस दिसतो. विशेषत: सीमाविभागांत हा परिणाम अधिक दृग्गोचर होतो. त्यामुळें महाराष्ट्रांतून कर्नाटकांत वा आंध्र प्रांतांत, विशेषत: सीमांलगतच्या विभागांत, व्यवहार करतांना मराठी भाषिकांस विशेष अडचण पडत नाहीं. पण तमिळनाड व केरळ हे प्रांत महाराष्ट्रास सलग नसल्यानें, तमिळ व मल्याळम् या भाषा महाराष्ट्रियांस अवघड वाटणें साह-जिकच आहे.

अन्य भाषेचा परिचय करून घेतांना लिपीचीहि एक अडचण येते. उत्तर भारतांतील संस्कृत गटांतील भाषांच्या लिपी सर्वस्वी देवनागरी नसल्या तरी त्या देवनागरीस बऱ्याच जवळच्या आहेत. त्यामुळें त्यांचा सराव होण्यास फारशी अडचण पडत नाहीं. परंतु द्राविड गटांतील भाषांच्या लिप्याहि अगदीं वेगळ्या असल्यानें ही अडचण अधिक तीव्र होते. या गटांतील भाषांचाच केवळ विचार केला तर तमिळ व मल्याळी लिपींत कांही साम्य आहे. तसेंच कन्नड व तेलुगु लिपींतहि. किंबहुना कन्नड व तेलुगु या लिप्यांचा समन्वय करण्याचे प्रयत्न सरकारी पातळीवर चाललेहि आहेत. तमिळ व मल्याळी लिप्यांच्या संबंधी असा प्रयत्न कोणी करूं लागल्याचें ऐकिवांत नाहीं. पण कालांतरानें तसेहि प्रयत्न होतील यांत संदेह नाहीं.

महाराष्ट्रांतून तमिळ प्रांतांत जे लोक ऐतिहासिक काळांत आले, त्यांनीं तमिळ भाषा चांगलीच आत्मसात् केली, इतकी कीं, ते मराठीच विसरूं लागले. या दुर्घटनेचीं कारणें अनेक आहेत. तथापि आज जे महाराष्ट्रीय व्यवसायानिमित्त कमीअधिक काळाच्या वास्तव्यासाठीं तमिळ प्रांतांत येतात, त्यांना केवळ व्यवहाराच्या दृष्टीनें—साहित्याच्या अभ्यासाच्या दृष्टीनें नव्हे—ज्या अडचणी येतात, त्यांचा अनुभव मला आलेला आहे व अनेक बंधुभगिनींच्या तोंडून मीं त्या ऐकिल्या आहेत. केवळ त्यांच्या सोयीसाठींच या पुस्तकाची कल्पना माझ्या मनांत आली. **महाराष्ट्रांतून मद्रास येथें किंवा तमिळ प्रान्तांत अन्यत्र आल्यावर व्यवहारापुरता तमिळ भाषेचा परिचय अशा महाराष्ट्रियांस व्हावा, हा या पुस्तकाचा हेतु आहे.** तमिळ साहित्याचा ज्यांना अधिक परिचय करून घ्यावयाचा असेल, त्यांनाहि **पहिली पायरी म्हणून** या पुस्तकाचा खचित उपयोग होईल. सामान्य व्यवहारांत, घरींदारीं, बाजारहाटांत या पुस्तकानें काम भागेल असा माझा विश्वास आहे.

प्रथम हें सहजच ध्यानांत येईल कीं, या पुस्तकांत तमिळ शब्द नागरी लिपींत छापले आहेत. नागरी लिपी उच्चारलेलें सर्व लिहून काढण्याच्या दृष्टीनें पूर्ण आहे. तथापि प्रत्येक भाषेच्या व तिच्यांतील उच्चारांच्याहि कांहीं लकबी असतात. त्यामुळें कांही तमिळ अक्षरांचे उच्चार ती व्यक्तवूं शकणार नाहीं. उदाहरणार्थ तमिळ भाषेंत आपल्या भाषेंतल्या "ळ" सारखें एक अक्षर आहेच. पण दुसराहि एक "ळ" आहे. त्याचा उच्चार "ष" व "ळ" यांच्यामध्यें कोठेंतरी येतो. फळ या अर्थाचा तमिळ शब्द "पऴम्" यासारख्या शब्दांत तो येतो. त्याचा शुद्ध उच्चार तमिळ भाषियाकडूनच ऐकिला पाहिजे. पण एकंदरींत तमिळ लिपि बरीच अपूर्ण आहे. स्वरांच्या बाबतींत तमिळ भाषा श्रीमंत आहे. आपण इ, ई, उ, ऊ असे ऱ्हस्व व दीर्घ स्वर मानतों. पण अ+इ किंवा ई=ए आणि अ+उ किंवा ऊ=ओ असेंच आपण म्हणतों. तमिळमध्यें ए व ओ हे संयुक्त स्वरहि ऱ्हस्व व दीर्घ या दोन जातीचे आहेत. अनुस्वार व विसर्ग या दोहोंस तमिळ भाषेंत फाटा दिला असल्यानें प्रत्येक व्यंजनाची बाराखडीच राहते. चौदाखडी होत नाही.

तमिळमधील स्वरवर्गाचें हें वैभव व्यंजनवर्गास लाभलें नाहीं. क, ख, ग, व घ या चारहि उच्चारांसाठीं तमिळमध्यें एकच अक्षर आहे व त्याचा वेगवेगळा उच्चार संदर्भावरून करावा लागतो. "कांती" हा उच्चार व्यक्तविणारी तमिळ अक्षरें लिहिलीं, तर त्यांचें वाचन "कांती" या प्रमाणें "खांदी" व "गांधी" असेंहि होऊं शकेल. अशीच गत च, ट, त, प या वर्गांची. प्रत्येक वर्गांतील अनुनासिक मात्र स्वतंत्र आहे. "बेबी" असा उच्चार करण्यासाठीं तमिळमध्यें "पेपी" असेंच लिहावें लागेल. मुंबईसाठीं तमिळमध्यें "पंपाय्" असें लिहितात व त्याचा उच्चार "बंबाय्" असा करतात.

तमिळमध्यें "न" व "र" असे उच्चार होणारीं प्रत्येकी दोन अक्षरें आहेत. या दोन अक्षरांच्या उच्चारांत थोडा भेद आहे व हीं भिन्न अक्षरें वापरून बनविलेल्या शब्दांचे अर्थ भिन्न होतात. "श" व "स" साठीं वेगळीं अक्षरें नाहींत. त्यांची कामगिरी "च" कारास करावी लागते. त्याचप्रमाणें "ह" या उच्चाराचा भार "क" वर पडतो. संदर्भाप्रमाणें त्याच अक्षरांचे उच्चार वेगळे करावे लागतात.

वर जो दुसरा "र" सांगितला तसे दोन "र" एकापुढें एक लिहिले तर त्यांचा संयुक्त उच्चार "ट्र" असा होतो. सारखेच उच्चार दर्शविणारीं एकापेक्षां अधिक अक्षरें असल्यानें एखाद्या शब्दांत त्याच उच्चाराचें वेगळें अक्षर लिहिलें तर अर्थ बदलतो. केव्हांकेव्हां लेखन एका प्रकारचें तर वाचन वेगळ्याच प्रकारचें होतें. कोठेकोठें शब्दांतील कांहीं अक्षरांचा उच्चार दीर्घ करावा लागतो. यासाठीं हें पुस्तक छापतांना अवग्रह चिन्हाचा उपयोग केला आहे. कांहीं शब्दांपुढें अशी × फुली केली आहे. तिचा अर्थ असा कीं, ते शब्द साधारण व्यवहारांत वापरींत नाहींत. विद्वानांच्या भाषणांत किंवा वरच्या प्रतीच्या भाषेंतच त्यांचा उपयोग होतो. + असें अधिक चिन्ह ज्या शब्दांपुढें कंसांत केलें असेल ते सामान्यत: खालच्या दर्जाच्या लोकांच्या वापरांत येतात. त्यांचा उपयोग पुष्कळदां अशिष्ट गणला जातो. मराठी शब्दास तमिळ प्रतिशब्द देतांना सामान्य व्यवहारांत वापरले जाणारे शब्दच बहुतेक दिले असून अतिशिष्ट वा अशिष्ट शब्द वर सांगितल्याप्रमाणें वेगळे दर्शविले आहेत.

प्रत्येक भाषा बोलण्याच्या ज्या कांहीं लकबी असतात, त्या ती भाषा बोललेली ऐकूनच समजतात. तथापि, शब्दांचा भरणा बराच असला व ते वापरण्याचे कांहीं ठोकळ नियम ध्यानांत आले म्हणजे इतक्या पायावर बोलण्याची इमारत उभारणें सोपें जातें.

आपल्या मुळाक्षरांत अंतर्भूत झालेलीं "क्ष" व "ज्ञ" हींचशीं काय पण कोणतींच जोडाक्षरें तमिळमध्यें नाहींत. जोडलेलीं अक्षरें लिहिण्याच्या दोन पद्धति आहेत. आपणहि जोडाक्षर स्पष्ट करावयाचें असल्यास 'ब्र' च्या ठिकाणी 'ब्‌र' असें म्हणजे 'ब' चा पाय मोडून लिहूं. तमिळमध्यें अक्षराचा पाय मोडण्याऐवजीं त्याच्या डोक्यावर टिंबाचें ओझें देतात. तमिळमध्यें "ब्र" लिहिण्याची दुसरी पद्धत "बिर" अशी. शुद्ध तमिळमध्यें "सुब्रह्मण्यम्" असें लिहावयाचें तर "चुपिरमणियम्" असें लिहावें लागेल. ज, स, ष, ह, क्ष व ज्ञ या उच्चारांचीं वाचक अक्षरें तमिळ लिपींत नाहींत. पण हे उच्चार मात्र आहेत. म्हणून ते दर्शविणारीं स्वतंत्र अक्षरें तमिळमध्यें समाविष्ट करण्यांत आलीं व त्यांना "ग्रंथ" अक्षरें असें नाव पडलें. संस्कृत शब्दांचें लेखन नीट करतां यावें म्हणून तमिळमध्यें हीं अक्षरें घुसडलीं गेलीं असें कांहींचें मत आहे. शुद्ध तमिळच्या अभिमान्यांचा हीं अक्षरें वापरण्यास विरोध आहे. हीं अक्षरें सामान्यतः लेखनांत किंवा छापण्यांत फार कमी प्रमाणांत वापरतात.

व्यंजनांच्या व जोडाक्षरांच्या उणीवेचा प्रत्यय बोलतांना किंवा बोललेलें ऐकतांना फारसा यावयाचा नाही. पण स्वरांच्या वैभवाचा मात्र खचित येईल. कारण ए व ओ हे ऱ्हस्व व दीर्घ स्वर सहज बोलतांनाहि जाणवतात.

तमिळ भाषेंत लिंगभेद भरपूर आहे. नामांत बहुसंख्या नपुंसकलिंगाची आहे. कारण निर्जीवच काय, पण मनुष्येतर सजीव प्राण्यांचीं वाचक नामेंहि नपुंसकलिंगीच मानतात. मनुष्यवाचक नामांतच काय तें पुल्लिंग किंवा स्त्रीलिंग लागतें. संस्कृत भाषेंत क्रियापदांचीं रूपें लिंगाप्रमाणें बदलत नाहींत मराठी भाषेंत तीं पुष्कळ वेळां बदलतात. तशींच तमिळ-मध्येंहि बदलतात. अर्थांतच हे ठोकळ नियम झाले. तमिळ व्याकरणाची

चर्चा येथें करण्याचा उद्देश नाहीं. या पुस्तकांत नमुन्यासाठीं म्हणून कांहीं क्रियापदांचीं रूपें दिलीं आहेत.

त्याचप्रमाणें तमिळ भाषेंत अंकांची वाचणी वेगळी दिली आहे. मराठीं भाषेंतील म्हणींशीं कांहीं समानार्थक तमिळ म्हणी व तसेंच कांहीं वाक्प्रचारहि दिले आहेत. कांहीं नित्याच्या व्यवहारांत उपयुक्त ठरतील अशीं मराठी वाक्यें व त्यांचें भाषांतर दिलें आहे. वाक्प्रचार व म्हणी छाप-तांना मराठी शब्द व त्याचा अर्थ व्यक्त करणारे तमिळ शब्द हे जाड ठशांत किंवा तिरप्या ठशांत छापले आहेत. हें सर्व करतांना व्यवहारी उपयुक्ततेचें धोरण ठेविलें आहे.

थोड्या वर्षांपूर्वीपर्यंत येथील शिक्षणांत इंग्रजीचा प्रभाव खूपच होता. उच्च प्राथमिक वर्गापासून इंग्रजी भाषा शिकविली जात असे. इतकेंच नव्हे तर इतर विषयांच्या शिक्षणाचें माध्यमहि इंग्रजीच असे. मिशनरी शाळांतून तर प्राथमिक शिक्षणापासूनचा सर्व अभ्यास इंग्रजींतूनच होत असे. त्यामुळें इकडे आलेल्या महाराष्ट्रियांस आपलीं मुलें शिक्षणासाठी मिशनरी शाळांतून पाठवावीं लागत. स्वराज्य-स्थापनेनंतर इंग्रजीचें महत्त्व कमी झालें. त्यामुळें एका सरकारी आज्ञेनुसार मिशनरी शाळांतूनहि शिक्षणाचें माध्यम एकदम तमिळ झालें. लंबकाचा झोका या टोंकापासून त्या टोंकापर्यंत गेला. इंग्रजीचें समूळच उच्चाटन झालें. त्याचा परिणाम असा झाला कीं, केवळ महाराष्ट्रांतूनच नव्हे, तर तमिळव्यतिरिक्त अन्य कोणत्याहि प्रांतांतून आलेल्या व येथे स्थानिक होण्याचा संभव नसलेल्या अनेकांस ही अडचण जाणवू लागली. या क्रांतिकारक उपक्रमाचा अनुभव ३–४ वर्षें घेतल्यानंतर मिशनरी शाळांतून इंग्रजी माध्यम पुन्हा स्वीकार-ण्यांत आलें.

या उपक्रमांच्या तडाख्यांत माझी मुलगी चि. लतिका सांपडली होती. तिला ३–४ वर्षांच्या काळांत तमिळ माध्यमांतूनच दुय्यम शिक्षण घ्यावें लागलें. या अडचणींतून एक अल्प लाभ हातीं लागला. तो असा कीं, माझ्या तोंडीं बसलेले अनेक तमिळ शब्द व वाक्यें हीं चुकीचीं आहेत असें चि. लतिकेनें माझ्या ध्यानीं आणलें व त्यांत योग्य त्या दुरुस्त्या केल्या.

इकडे नवीनच आलेल्या महाराष्ट्रीय भगिनी (कारण बंधूपेक्षां भगिनींसच स्थानिक भाषेंत अधिक व्यवहार करावा लागतो) माझें वास्तव्य इकडे बऱ्याच वर्षांचें म्हणून आपली भाषेची अडचण मजजवळ बोलून दाखवूं लागल्या. त्यांची ही अडचण स्वानुभवानें मला पटलेली होतीच.

मिशनरी लोकांस तमिळ भाषा यावी म्हणून त्यांच्या उपयोगासाठीं तमिळ शिक्षण देणारीं कांहीं पुस्तकें पूर्वीं प्रसिद्ध झालीं आहेत. अर्थात् तमिळ शब्दांचें मुद्रण या पुस्तकांत इंग्रजी लिपींतून केलें आहे. इंग्रजी लिपींत छापलेले तमिळ शब्द वाचतांना कित्येकदां हंसूं येतें. कारण इंग्रजी लिपीच दरिद्री आहे. अनेक उच्चार त्या लिपीनें दर्शविलेच जाऊं शकत नाहींत. तेंहि असो. पण या पुस्तकांतील भाषा सामान्य व्यवहारांतील न वापरतां विद्वान लोकांच्या बोलण्यांत येणारी अशी बोजड वापरली आहे. या पुस्तकांच्या आधारानें मिशनरी लोक तमिळ बोलूं लागले, म्हणजे त्यांची भाषा सामान्य भाषेपेक्षां वरच्या पातळीची येते व कित्येक तमिळ भाषीय श्रोत्यांस ती उलगडतहि नाहीं. सरावानें तिला आस्ते आस्ते व्यावहारिक स्वरूप येतें. नाहीतरी आपणास बोलण्यासाठीं व बोललेलें समजण्यासाठीं नवीन भाषा शिकावयाची असेल तेव्हा ती ऐकून, बोलून व ऐकतांबोलतांनाच शिकली पाहिजे. पण या धोपट मार्गास लागण्यापूर्वीं या पुस्तकाचा उपयोग केला तर तो मार्ग लवकर आक्रमतां यावा व आक्रमतांना श्रम कमी पडावे असें वाटतें.

हिंदी भाषेंतून तमिळ शिक्षण देणारींहि कांहीं पुस्तकें आहेत; पण तीं अगदीच त्रोटक आहेत. या पुस्तकांतून तमिळ शब्द नागरी लिपींत छापले असल्यानें त्यांतील तमिळ उच्चार शक्य तेवढे शुद्ध साधले आहेत. प्रस्तुत पुस्तकांतील तमिळ शब्द नागरी लिपींत छापले आहेतच; पण शिवाय पुस्तकाची रचना करतांना दृष्टि बरीच व्यापक ठेवली आहे.

मराठींतून तमिळ शब्द व वाक्यें समजण्यासाठीं पुस्तक हवें हा विचार मनांत वेगानें येऊं लागला. कांहीं मराठी शब्द प्रथम लिहून त्यांपुढें समानार्थक तमिळ शब्द लिहूं लागलें. पण मराठी शब्दांच्या शुद्धतेविषयी जशी निश्चिति वाटे, तशी तमिळ शब्दांसंबंधीं वाटेना. मराठी व तमिळ

या दोन्ही भाषांशीं चांगला परिचय असल्यावांचून अशा शब्दकोशाचें धाडस होण्यासारखें नाहीं. अवश्य त्या मराठी शब्दांची यादी करून त्या पुढें त्या अर्थाचे एक वा अनेक तमिळ शब्द लिहिले. स्थानिक मैत्रिणींशीं चर्चा करून त्यांत दुरुस्त्याहि केल्या. तरी पण मनाचें समाधान होईना. सध्यां येथे सदर्न रेल्वेंत काम करीत असलेले श्री. नीलकंठन् यांचें नांव कांहीं मित्रांनीं साहाय्यार्थ सुचविलें. तमिळ ही त्यांची मातृभाषाच. ते कांहीं वर्षें पुण्यास वास्तव्य करून होते. मराठी लिहिण्यावाचण्यास ते शिकले व मराठी भाषेचा त्यांनीं तेथें व्यासंग केला. मराठी शब्दांतील अर्थाचे बारकावे जाणण्याइतकें त्यांस मराठीचें ज्ञान आहे. त्यांची सार्व-जनिक कामाची हौसहि दांडगी आहे. त्यांच्यापुढें हा विषय मांडल्यानंतर त्यांनीं या कामीं मला साह्य करण्याचें आश्वासन तत्परतेनें दिलें. त्यांचा नित्याचा व सार्वजनिक कार्याचा व्याप सांभाळून या उपयुक्त कार्यासाठीं त्यांनीं आपला कितीतरी अमूल्य वेळ खर्च केला. त्यांच्या या साहाय्यामुळें पुस्तकांतील शब्दांची संख्या जशी वाढवितां आली तशीच चुकांची संख्याहि शक्य तितकी कमी करतां आली.

महाराष्ट्रांतील कणखर राष्ट्रीय वृत्तीचे व व्यासंगी इतिहास-संशोधक आणि भाषा-पंडित श्री. शंकरराव जोशी यांनी माझ्या आग्रही विनंतीस मान देऊन या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिली. त्याचें मोल शाब्दिक आभा-रांनीं व्यक्त करतां येणें शक्यच नाहीं. त्यांच्या मागील अनेक कार्यांचा व्याप व त्यांची या वयांतील शरीरप्रकृति हीं ध्यानांत घेतां त्यांच्या प्रेमळ आपुलकीसच प्रस्तावलेखनाचें श्रेय दिलें पाहिजे. पु. वि. गृहाच्या लोकसंग्रह मुद्रणालयाचे श्री. बाबासाहेब गांगल यांनीं मजकडून होणाऱ्या विलंबाची तक्रार न करतां तत्परतेनें छपाईचें काम हातीं घेऊन व योग्य प्रकारें पार पाडून मला उपकृत केलें आहे.

मराठी भाषिकांनीं दुसऱ्या एका प्राचीन भारतीय भाषेचा परिचय या पुस्तकाच्या साहाय्यानें करून घ्यावा व भारताचें एकराष्ट्रीयत्व दृढ करण्यास सहाय्य करावें हीच त्यांस प्रार्थना.

आषाढ शुद्ध ११ शके १८८३<br>
दि. २४ जुलै १९६१

**सौ. रमाबाई जोशी**

# भारतीय घटनानुकरण : स्फुट प्रस्ताव

## राष्ट्राची गरज व व्यक्तिगत व्यवहाराची निकड

आपण आतां 'देव'भक्तीबरोबर 'देशा'कडे चाललों आहों. केवळ वर्णमालेच्या दृष्टीनें नव्हे तर 'इहैव तैर्जितः सर्गः' किंवा 'अैलथडीचा मोक्ष'* ह्या न्यायानें. अर्थातच

'देशाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांच्या गांठी ।
राष्ट्रघटनेच्या पोटीं । देशबंधुत्व साधावें ॥'
(दासबोध द. ४ स. ८)

असा उचित बदल देवाच्या जागीं देश आल्यानें सहजच झाला व ह्याच दृष्टीनें प्रस्तुत पुस्तक आदरणीय व स्वीकार्य झालें आहे. देवाच्या जागीं देश आला, म्हणजे देव सोडला आणि देश आला असें नाहीं. तर देवच देशाचार, राष्ट्राचार आम्ही पाळतों कीं नाहीं हें जवळ बसून पाहात आहे व त्या राष्ट्राचारांतीलच हें छोटें पुस्तक ही एक स्पृहणीय ग्रंथकृति आहे.

महाराष्ट्रांतील एक कुटुंब शेजारच्या एका प्रांतांत जाऊन राहिलेलें. त्यांतील गृहिणीस वाटलें, धर्म एक, (संस्कृताश्रित) संस्कृति एक, आध्यात्मिक तत्त्वज्ञान एक, कांहीं सणवार एक, व्यक्तींचीं नांवें एकच, राहतो तो समुद्रवलयांकित देश एक, देव एक, वेद-पुराणादि ग्रंथ एक. असे किती तरी एकत्वाचे मुद्दे असतांना केवल भाषा-भिन्नत्वामुळें एकत्वाला समाजैक्याला—विशेषतः राष्ट्रैक्याला आपण मुकत आहों! आपलें पुष्कळत्व, आपलें मोठेपण हेंच आपल्या राष्ट्रीय भावनेला आड येणारें झालें!! हजारों मैल लांबीरुंदीची ही आमची राष्ट्रभूमि. तिच्यामध्ये विविधताहि पुष्कळच. तथापि अनेकविधत्वामध्यें वर म्हटलेले एकविधत्वाचे मुद्दे जरी अनेक असले तरी अडचणीहि आहेतच. त्या दूर करून एकोपा साधणें ही आज फार मोठी गरज.

राष्ट्राची गरज आणि व्यक्तिगत व्यवहाराची निकड हीं दोन्ही जेव्हां एक होतात तेव्हां राष्ट्राच्या प्रगतीनें तेवढ्यापुरतें मूळ धरलें असें होतें.

---

* 'तात्यासाहेब केळकर यांच्या आठवणी' ह्या ग्रंथांतील त्यांचा पूर्वप्रसिद्ध लेख.

त्यांपैकींच एका अंगाचा पुरस्कार ह्या लहानशा वाटणाऱ्या पुस्तिकेंत एका लहान अबलेनें केला आहे. केवढी धन्यवाद मनांत येणारी थोर गोष्ट आहे ही! ह्या प्रसंगानें जी एक गोष्ट आठवते ती येथें प्रथम देण्याजोगी वाटते.

* * *

## ' नॅशनल स्क्रिप्ट ' : भारत–राष्ट्र-लिपि

बरींच वर्षें झालीं ह्या गोष्टीला. एकदां एक तरुण मल्ल, त्याच-बरोबर त्याचा मित्रहि तसाच होता, मजकडे मंडळांत आला. पाहतांच, अर्थ माझ्या आधीं ध्यानीं आला नंतर शब्द. जरी त्यानें वस्त्र-प्रावरणें रूढी-प्रमाणें घेऊन, शरीर झांकून टाकलें होतें, तरी कळून आलें कीं, हा खरा शरीरसंपन्न, जेठी, पैलवान आहे.

बसतां बसतांच त्यानें मला प्रश्न केला, "काय हो, आपल्या सर्व हिंदुस्थानचा असा एखादा खेळ आहे का? परवां आमची फार फजिती झाली. म्हणून वाटलं कीं विचारावं तुम्हांला. इतिहासांत तसें कांहीं आहे का?"

मला प्रश्न नेमका कळावयाचा होता. मीं विचारलें कीं, "कसली फजिती आणि नेमका व पुरता प्रश्न काय तुमचा?"

थोडचाशा खुलाशानें त्यानें आपलें म्हणणें सांगितलें. "नुकतेच आम्ही परदेशांत जाऊन आमचे मल्लविद्येंतील विविध खेळ दाखविले. मलखांब, वेताचा मलखांब, पाटावरील मल्लखांब, बोथाटी, कुस्ती इ. इत्यादि. नंतर निरनिराळे फोटो, व्यायामप्रकार, रक्त तपासणें, खाणें विचारणें, इत्यादि हें सर्व ठीक झालें. पण दोन चार राष्ट्रांतील खेळाडू मंडळी आमची ही मुलाखत घेत असतां त्या मुलाखतींत शेवटीं आमची चांगलीच फजिती झाली. पहिला प्रश्न कीं, 'तुमचा नॅशनल् प्ले कोणचा?' आम्हीं चटदिशीं विचारपूर्वक दूरवर म्हणजे भारतभर दृष्टि पुरवून उत्तर दिलें 'क्रिकेट.' कारण मद्रास, महा-राष्ट्र, बंगाल, पंजाब, गुजरात इत्यादि सर्व ठिकाणी सर्व मिळून हा खेळ भारतभर खेळला जातो. पण हें उत्तर ऐकतांच ते आमचेकडे व आपापसाकडे आश्चर्यचकित होऊन पाहून म्हणाले, "कां हो, हा खेळ मूळचा इंडियन आहे? आतांपर्यंत आपली समजूत कीं हा आपला मूळपासून ब्रिटिशांचा

युरोपियनांचा? पण हे वेगळेंच बोलताहेत!! एक तर ह्यांना स्वतःचें राष्ट्र तरी नाहीं किंवा ह्यांना स्वतःचा खेळ तरी नाहीं."

पुढें तो मल्ल म्हणाला, "त्यांनीं आणखी असेच प्रश्न विचारलें; पण आम्हीं कांहीं उत्तरेंच दिलीं नाहीत. त्यांनी म्हटलें 'तुमचे नॅशनल **फ्लॅग** कोणचें, नॅशनल ॲम्यूजमेंट कोणची, **नॅशनल** फ्लॉवर, नॅशनल-कलर -लँग्वेज-ड्रेस-स्क्रिप्ट इत्यादि इत्यादि. नॅशनल व त्याच्या बरोबर इतकें कांहीं असतें, हेंच जेथें आम्ही प्रथम ऐकत आहों तेथे चूपचाप बसून तें सर्व नुसतें ऐकून घेण्याशिवाय दुसरें काय करणार! "

त्यांचें हें सर्व ऐकून मीहि स्तब्धच्च झालों; पण थोडासा आब राखण्या-साठीं म्हटलें, 'पाहिलें पाहिजे. तूर्त कुस्ती—पण आमच्या प्रकारची—हा खेळ नॅशनल सांगितला तर चालेल. तसाच हुतुतू.'

प्रस्तुत पुस्तकानें वरील प्रश्नांतील **'नॅशनल स्क्रिप्ट'** पुरतें उत्तर देण्याचा योग्य व अल्प प्रयत्न केला आहे.

*　　*　　*

## कांहीं पूर्व उपक्रम

वरील प्रश्नकथा होण्यापूर्वींच त्या प्रश्नांपैकीं कांहीं प्रश्नांचें निराकरण होईल अशी दिशा सुरू झाली होती; म्हणजे ज्यायोगें राष्ट्रवृत्तीचें आधुनिक कालास अनुसरून बीजारोपण होईल असा यत्न सुरू झाला होता. **'लिपेर्यथावत् ग्रहणेन वाङ्मयं लिपीमुखेनैव स्वराष्ट्रमाविशत् ।'** लिपीपासूनच यथार्थपणें राष्ट्र—भावनेला प्रारंभ झाला होता. म्हणजे विधिमंडळाच्या कांहीं हिंदी किंवा नागरीप्रेमी सदस्यांनीं एक मंडळ स्थापन करून **देवनागरी** लिपीत सार्वभाषिक साहित्य छापण्याचा उपक्रम केला होता. **शेठ गोंविददास** हे मध्यप्रदेशीय खासदार त्याचे अध्वर्यु होते. **'देवनागर'** ह्या नांवाचें नियत-कालिक त्यांनीं सुरू केलें होतें. कांहीं अंक फारच सुंदर व उत्तम निघाले. प्रत्येक पानावर दोन स्तंभ: एका बाजूस मूळ साहित्य त्याच भाषेंत पण **नागरी लिपींत** व समोर दुसऱ्या स्तंभांत त्यांचा अनुवाद हिंदींत असे. या 'देवनागरला'हि एक पूर्वज होता. तो म्हणजे ह्याच नांवाचें **श्यामसुंदर-दास** ह्यांनीं चालविलेलें मासिक. **आजहि श्रीविनोबाजीची गीता-प्रवचनें**

जवळजवळ सर्व **भारतीय भाषांत व राष्ट्रलिपींत म्ह. नागरी लिपींत** प्रसिद्ध होत आहेत. आणि त्याद्वारां दूरस्थ भारतवासी एकमेकांच्या निकट येत आहेत.

*　　　　*　　　　*

**ऐतिहासिक** म्हणतां येईल असाहि एक दाखला देतां येण्याजोगा आहे. तंजावरच्या सरस्वती-महाल ग्रंथमालेंत महाराजा शरफोजीकृत (इ. १७९८–१८२४) 'कोटर्यांचे साहित्याचे जिन्नस' म्हणून एक पुस्तक प्रसिद्ध आहे. त्यांत महाराजांनीं रचलेली **तमिळ व तेलुगु नृत्यगीतें नागरींत** छापलीं आहेत.

*　　　　*　　　　*

मागें म्हणजे ५४–५५ वर्षें झालीं ह्या गोष्टीला. इ. १९०५ च्या डिसेंबरच्या तिसऱ्या आठवड्यांत **'एक–लिपी-परिषद'** नामक काशी क्षेत्री एक सभा झाली. ही परिषद व ही बैठकहि नागरी प्रचारिणी सभेकडूनच भरविली गेली होती. सदर बैठकीचे अध्यक्ष बडोदा राज्याचे प्रमुख मंत्री **पंडितवर्य श्रीमान् रमेशचंद्र दत्त** हे होते. सभेंत **लोकमान्य टिळक,** दि. ब. **अंबालाल साकरलाल,** अध्यक्ष श्री. दत्त इत्यादींचीं भाषणें झालीं. **अध्यक्ष दत्त** यांनीं 'सर्वांस सहज अवलंबन करतां येईल अशी सोयीची व सोपी लिपी म्हणजे देवनागरी कशी आहे, हें सांगून गायकवाड सरकारनें आपले हुकूम छापतांना हीच लिपी स्वीकृत केली आहे,' हें मुद्दाम सभेंत कळविलें. **दिवाणबहादूर अंबालाल** ह्यांनीं 'सर्व हिंदुस्थानची एक लिपी करावी आणि सर्वत्र शास्त्रीय ग्रंथांतून पारिभाषिक शब्दहि एकच असावे. हा जो ह्या परिषदेचा हेतु त्याची आवश्यकता प्रतिपादन करून गुजराती क्रमिक पुस्तकांत नागरी लिपीस सरकारी बुककमेटीनें अर्धचंद्र दिला ह्या बद्दल निषेध व्यक्त केला.' **लोकमान्य टिळक** ह्यांनीं आपल्या भाषणांत जुने ताम्रपट आणि हस्तलिखित ग्रंथ ह्यांच्या आधारानें व भाषाशास्त्रदृष्टचा नागरी लिपी सर्व हिंदुस्थानांत प्रचारांत आणणें कसें इष्ट व सोपे आहे तें सांगितलें. त्याबरोबरच **एकच वेळामापनाची** आणि **एकच वजनमापांची** समान पद्धत प्रचारांत आणणेंहि आवश्यक आहे हें सांगून ह्या आधीं एक **लिपी ही गोष्ट अधिक महत्त्वाची** आहे हें सांगितलें. हा मुद्दा प्रतिपादन करतांना

म्हटलें ' तसेंच या कामीं सरकारची फारशी मदत मिळण्याचा संभव नसल्यामुळें निरनिराळ्या प्रांतांतील सुशिक्षितांनींच ही गोष्ट मनावर घेतली पाहिजे. युरोप खंडांत अठरा देश व तितक्या भाषा असल्या तरी त्या सर्वांची एकच रोमन लिपी असल्यामुळें भाषाज्ञान सुलभ झालें आहे आणि एकमेकांचे विचार कळविण्यासहि फार मोठें साहाय्य मिळत आहे. पुढेंमागें एक भाषा उत्पन्न होण्यास ह्या एक लिपी-प्रसाराच्यायोगेंच सहाय्य मिळेल आणि राष्ट्रैक्य व विचारैक्य होण्यास एकलिपीची मोठी मदत होईल ह्यांत शंका नाहीं. लोकसंख्या व लोकभाषा ह्यांचा विचार केला असतां आज असलेल्या प्रांतीय लिपीबरोबर देवनागरी लिपी शिकविण्याचा जर उपक्रम केला तरी पुष्कळ उपयोग आहे. '

[स्फुट सूचना केसरी ९।१।१९०५ मंगळवार]

बंगालमध्यें स्वदेशी आंदोलनाच्या काळांत ह्या परिषदेमार्फत 'देवनागर' ह्या नांवाचें मासिकहि सुरू केलें होतें. ह्या एकलिपीप्रसार–कार्याचा **जस्टिस शारदाचरण मित्र,** पंडित अंबिकाप्रसाद मुजुमदार प्रभृतींनीं बंगाल्यांत चांगला पुरस्कार केला आणि सरकारी कौन्सिलमधील ठराव इत्यादि देवनागरी लिपींत आणि निरनिराळ्या भाषांत देण्याचाहि उपक्रम झाला. [पहा केसरी १९०७ जुलै १६]

**राष्ट्रलिपी** व भारतीय भाषा कांहीं ग्रंथ––

१ 'मराठी–कानडी लिपिधारा'–इ. १८६३ धारवाड गो. प्र. जोशी.

१ 'तेलंगी–मराठी शब्दकोश' देवनागरी इ. १८७९ उपयुक्त शब्दसंग्रह; आत्माराम कान्होबा, मुंबई.*

१ उर्दू–मराठी कोष, बालबोध लिपि इ. १८९६.

**आजचें स्वरूप :––**ब्रिटिश अंमल असतांना हिंदुस्थानांतील निरनिराळ्या ठिकाणच्या पुढारी मंडळींच्या ठिकाणीं जी राष्ट्रीय वृत्ति व तदुद्भूत कार्यें दृष्टिपथांत येत, तेथें स्वराज्य आल्यानंतर मात्र राष्ट्रभावनेचा दीप प्रान्ताभिमानाच्या ज्योतीनेंच दिसला तर दिसतो अशी स्थिति आली आहे!

---

*श्री. गांगल, अ. वि. गृह प्रकाशन-प्रमुख, यांनीं भारती लिपींत जपानी–मराठी कोश छापला आहे. ज्याला चिनी भाषा व देवनागरी लिपी येते; मात्र मराठी भाषा येत नाहीं त्याच्या उपयोगी हा कोश येईल.

इंग्रजी लिपि व भाषा चालेल; पण हिंदी भाषा व नागरी लिपि नको, हें म्हणण्यापर्यंत मजल गेली! हें सर्वथा गैर आहे.

जुन्या काळीं प्रसंगीं निषेध दर्शविण्यासाठीं कांहीं बोलत. म्हणजे 'उद्यां एखाद्या × × × कडे जेवायला जाईन; पण अमक्याकडे प्राण गेला तरी जाणार नाहीं.' ह्यांमध्यें खरोखर आलीच वेळ तर म्हणणारा अनामिकाकडे जेवायला जाईल असें मुळींच नाहीं, त्या अमक्याकडे जाण्याचा निषेध दाखविला इतकेंच. त्याप्रमाणें प्रांताभिमानाची उत्कटता व आपुलकी दाखविण्याकरितां हें इंग्रजी प्रेम असतें तर ठीक होतें; पण कांहीं प्रांतांमध्यें स्थानिक स्वराज्याच्या पाट्यांवरून वगैरे खरोखर स्वप्रांताची भाषा व लिपि आली ह्यांत कांहीं गैर नाहीं. पण दुसरी बोध लिपि व भाषा इंग्रजीच, अट्टाहासानें अवलंबिली जाते; भारताची घटनामान्य लिपि व भाषा दर्शित होत नाहीं! हें कां भारताला स्वराज्य व स्वातंत्र्य मिळाल्याचें प्रतीक!!

**असें सुचवावेसें वाटतें** की, केंद्र-सरकारनें आवश्यक म्हणून, **देवनागरी लिपींत एखादा तरी आपापला सर्वमान्य ग्रंथ प्रत्येक प्रांतानें प्रतिवर्षी छापला पाहिजे** असा निर्बंध घालावा. तसेंच प्रत्येक विद्यापीठानें आपल्या शेजारच्या दोन्ही प्रांतांतील भाषांचा अवलंब करून त्या त्या भाषेंतील सर्वप्रिय ग्रंथ प्रत्येक वर्षी अवश्यमेव छापावे. [आणि अगतिक म्हणून हेंहि म्हणून ठेवावयाचें कीं, प्रत्येक प्रांताच्या लिपीला व भाषेला एकेकदां राष्ट्रभाषेचा व लिपीचा मान द्यावा. ह्यायोगें सगळा गोंधळ, व्यवहारशून्यता व अचरटपणाच दर्शित होणार आहे. पण काय करणार? असो.]

## प्रस्तुत ग्रंथाचें वैशिष्टय

नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या **नरवणे शब्दकोशांत**—सोळा भाषांमध्यें हा कोश छापला आहे—सामान्य **व्यवहारांतील** म्हणून **अडीच हजार शब्द** संग्रहीत केले आहेत. जन्मोजन्म ज्यांचा व्यवहार चालतो, पण लिहिणेंवाचणें नाहीं, अशा लोकांच्या तोंडीं अधिकांत अधिक किती शब्द येतात; तसेंच ज्यांना शिक्षित म्हणूं, सुशिक्षित नाहींत; असें जें नागरजीवन त्यांत किती शब्द येतात व ते कोणते, हेंहि लक्षांत आणून **प्रस्तुत शब्दकोष** सिद्ध केला आहे. म्हणजे ४७७६+पुरवणी **११५** सह एकंदर शब्द ४८९१ **ह्या कोषांत**

**आलेले आहेत.** त्याशिवाय अंकबोध म्हणजे संख्यावाचक शब्द (४३), वार, महिने, विरामचिन्हें, वजनेंमापें, अंकगणितांतील प्रमख शब्द, दिशा, क्रिया-पदें, काळ, इत्यादि विविध शालेय व्यवहारांतील तमिळ शब्द देऊन मुख्य म्हणजे **वाक्प्रचार, म्हणी** दिल्या आहेत. म्हणींमध्यें दोन प्रकार आहेत. मराठी भाषेंतील समानार्थक तमिळ म्हणी (१०५), आणि कांहीं मूळ **तमिळ म्हणी** व त्यांचा मराठींत अर्थ (३०). पैकीं दुसऱ्या प्रकारच्या म्हणींवरून त्या समाजातील रीतिभाती समजुती कळून येण्यास मदत मिळते. एकच उदा० देतों. 'पांच मुली झाल्या तर राजासुद्धां देशोधडीला लागेल.' 'नेसायला लुगड्यासाठीं मावशीकडे गेली तों तीच शिंदीची चटई नेसून बसलेली.' इतरहि कांहीं म्हणी मोठ्या उद्‌बोधक आहेत.

'मार देणारे हातच मिठी मारतील.'

'विंचवाला मुनीम नेमला तर क्षणोक्षणीं नांगीच मारणार.'

'सासूच्या हातून भांडें फुटलें तर तें मातीचेंच होतें, सुनेच्या हातून फुटलें तर तें काशाचें होतें हो! .'

ह्याच अर्थाची दुसरी म्हण मीं ऐकलेली आहे 'अत्त कुट्टिन कुंडा आडु गोटी कुंडा (सासूच्या हातून मडकें फुटलें तर भोंकेंच पडलेलीं होतीं, फुटलें झालं. पण) कोडलु कुटिल कुंडा, कोत्त कुंडा (म्हणजे सुनेच्या हातून फुटलें तर तें अगदीं नवें होतें.)!

प्रसंगानें आणखीहि दोनचार म्हणी येथें देतों.

'आंगिरलो बेल्लमु गुल्लो लिंगानिको नैवेद्यम् ।' (देवळांत बसून बाजारांतील गुळाचा देवाला नैवेद्य).

'अंदरिकी शकुनम् चेप्पे बल्ली कुडिनी तोटिल्लो' सर्वांना शुभाशुभ सांगणारी पाल स्वतः धुणांत पडते व मरते.

'अटैते वैद्य वाप्नमु, इटैते वैतरणी गोदानम् ।' वैद्याला दिलेली गाय रोगी वांचला तर बिलांत धरावी, मेला तर वैतरणी तीरीं गोदान मिळालें असें समजावें.

एक ऐतिहासिक प्रसिद्ध व्यक्तीचा नामनिर्देश असलेली म्हण आढळली.

'आकण्णा मादण्णा गारु अंदलमु येकिते, साटिकी सारदा चिरुकट्ट येकिता उटा ।।' आकण्णा मादण्णा हे—कुतुबशाहींतील प्रसिद्ध दिवाण-

पालखींत बसून जातात, तेव्हां कोणी एक आपणहि तितक्याच उचीचे व बरोबरीचे आहों हें दाखविण्याकरितां सारखा तळयाच्या-कांठच्या भिंतीवर जाऊन बसतो. असो.

**टीप**—यांपैकीं "अंदिरिकी०" ही म्हण तेलुगु भाषेंतील असून उरलेल्या तीन कानडी भाषेंतील आहेत.

ह्या ग्रंथांत कांहीं शब्द दुबार आले असें वाटेल. शब्दसंग्रह ह्या दृष्टीनें ते प्रथम वर्णानुक्रमानें आले पण विशिष्ट विषयांतील म्हणून देतानाहि तेच शब्द पुनः देणें प्राप्त. उदा०—दिशा, अंक, वार, महिने, थोडेसें गणित इत्यादि उपयुक्त शब्द चट्दिशीं पाहतां यावे म्हणून वेगळे दिले व तसे कांहीं शब्द दुबार आले. कांहीं शब्द दुबार असले तरी अर्थछटा वेगळी असल्यामुळें ते दुबार म्हणतां येणार नाहींत. मिळविणें ह्यांत बेरजेंतील मिळविणें येतें तसें संपादन करणें हेंहि येतें. म्हणून हा शब्द पृ. ६१ व ९० वरहि आला.

रोजचें साधें जीवन जितक्या विविध अंगांनीं भरलेलें ततक्या पैकीं बऱ्याच अंगालंकारांनीं ही व्यावहारिक पुस्तिकाहि नटलेली आहे.

येथें हीहि गोष्ट लक्षांत येते कीं, लिपि ही, भाषा नेत्रगोचर करते आणि भाषा ही मुळांत श्रवणगोचर आहे. हेंच पुनः असें—बोलण्याचा कानांशीं संबंध आहे डोळ्यांशीं नाही, पण भाषा ही लिपिबद्ध केल्यामुळें, डोळ्यांनीं कोणालाहि व केव्हांहि ती पाहून वाचतां म्हणजे बोलतां येतें. अर्थात् ऐकवितां येते. असें जरी असलें तरी भाषेचें उच्चारण हा एक भाग उरतोच. ह्यास इंग्रजी शब्द कोष हें उत्तम उदाहरण आहे. शब्दाच्या स्पेलिंगांत कोठें अवसान घ्यावयाचें, थोडें थांबल्यासारखें करावयाचें, कोठें ॲक्सेण्ट घ्यावयाचा, कोणचा वर्ण गाळावयाचा वा कोणच्या वर्णाचा वेगळाच उच्चार करावयाचा इ. इ. हें उच्चारण होय व तें इंग्रजी शब्दापुढें वेगळें स्वतंत्रपणें सांगावेंच लागतें. हें फारसें सांगावें लागत नाहीं 'देवनागरीं'त. कारण लिपीच मुळांत निर्दोष व बरीच पूर्ण आहे. तथापि भाषेंतील शब्दांचे उच्चार हे थोडेसे सांगितलें पाहिजेतच. जेथें वाङमयासाठीं कोष वापरा-वयाचा असतो तेथें शब्दार्थ दिलेले असल्यानें काम भागेल. पण रोजच्या

व्यवहारासाठींच जो शब्दसंग्रह आहे त्याचें उच्चारण दर्शित केलेलें असणें प्राप्त वाटतें. 'नरवणे-कोषांत' हें उच्चारण दर्शित केलें आहे. असो. पुढील आवृत्तींत ह्याचा विचार व्हावा.

वर उल्लेखिलेले प्रयत्न केव्हांहि अभिनंदनीयच होत. तथापि प्रस्तुत पुस्तकाचें महत्त्व विशेष आहे आणि त्याचें कारण हें कीं ह्या पुस्तकाचें कार्य व्यवहार–प्रधानच मुख्य आहे. जो जो कोणी मद्रासच्या बाजूस प्रवासाला, राहाण्याला, कांहीं प्रासंगिक कामानिमित्तानें जाईल, त्याला त्याला हें पुस्तक जवळ बाळगण्यानें त्यांच्या कामांत फार मोठी मदत होईल. आणि उभयतांना वाटेल कीं, 'अरे, हा आपलाच आहे.' ज्याला म्हणून देवनागरी लिपी परिचित असेल तो तमिळहि होईल व महाराष्ट्रीय होईल असें हें लहानसें पुस्तक राष्ट्र–घटनानुकरणी व व्यावहारिक आहे.

* * *

## पुढील काळांत राष्ट्ररूपानेंच जगावयाचें आहे :––

शेवटीं एक गोष्ट आवर्जून सांगावयाची कीं, भारतीय लिपि ह्या नात्यानें देवनागरीचा सर्वांनीं स्वीकार करावा ह्याचा अर्थ त्या त्या प्रांतीय लिपी त्यांनीं त्यांनीं शिकू नयें असा मुळींच नाहीं. कारण, हजारों वर्षांच्या त्यांच्या त्या त्या लिपींतील वाङमयास त्यांनीं मुकावें असें कसें म्हणतां येईल ? पण राष्ट्रलिपि हें राष्ट्रजीवनाचें एक प्रमुख अंग ह्या नात्यानें लिपीचा स्वीकार आदरानें ह्या पुढील काळांत केला पाहिजे व हेंच प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें देशसख्यत्व होय.

**आभार** :––ह्या लेखनाच्या कामीं श्री. श्री. बा. जोशी (कलकत्ता नॅशनल लायब्ररी) (टोपण–नांव–कोषकार) ह्यांचें फार साह्य झालें. ग्रंथालयांतील कार्यकर्ता कसा असावा तर असा. श्री. जोशी यांस अनेक धन्यवाद.

१७ वर्षांपूर्वीं मी तिरुपती येथें एक वर्ष होतों. मद्रास-सरकारचा ऐतिहासिक हस्तलेख-संग्रह दुसऱ्या महायुद्धामुळें तेथें होता. त्यांतील (मोडी) पत्रें, पोथ्या पाहण्या-वाचण्याचें काम सरकारच्या निमंत्रणावरून व मंडळाच्या परवानगीनें मी करीत असें. तेथें असतां तेलुगु लिपि-परिचय मी करून घेतला होता; महाराष्ट्र-मंडळ स्थापन केलें होतें. मराठी भाषा थोडी का होईना ज्या घराण्यांत बोलली जाई अशी अनेक व्यवसायांतील मंडळी पाक्षिक वा मासिक सभांना सणावारीं जमत. असें हें वर्ष तेथें गुदरलें. मद्रासलाहि दोन-तीन वेळां गेलों. प्रस्तुत पुस्तक-संपादकांकडेच मुक्काम होई. तेव्हां असलें कांहीं बोलणें झाल्याचें अंधुक आठवतें; पण एवढ्यावरून हें वरील काम मजकडे यावें असें मुळींच नाहीं. संपादकांची

इच्छा. एकदां जोरानें नाहीं म्हटलेंहि; पण श्री. पु. दि. जोशी ह्यांचा आपलेपणाचा शब्द मोडवेना. त्यांतून लेखनासहि उशीर लागला. तेव्हां सर्वांची क्षमा मागून पुरें करतों.

**तमिळ लोकसंख्या** :—भारताच्या एकंदर लोकसंख्येच्या शेंकडा ८.२ इतकी लोकसंख्या तमिळांची आहे (२,६५,४६,७६४). मराठी भाषकांची ८.३ ह्या प्रमाणांत आहे. तेलुगु भाषिक १०.२ आहेत (३,२९,९९,९१६). हे आंकडे १९५७ इयर बुकांतील आहेत. खुद्द मद्रास राज्यांत २,४५,०४,१४६ तमिळी आहेत. ह्यांतील कांहीं तमिळ आंध्र, केरळ, म्हैसूर या राज्यांत आहेत व त्रावणकोर, महाराष्ट्र ह्याहि राज्यांत कांहीं आहेत. महाराष्ट्र राज्यांत १,१०,३७० तमिळी लोक आहेत.

**तमिळ वर्णमाला स्वर (१२)** अ, दीर्घ अ किंवा ऱ्हस्व आ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, दीर्घ ए, ऐं, ओ दीर्घ ओ, औ—**व्यंजने** [**१८**] क, ङ, च, ञ, ट, ण, त, न, प, म, य, ऱ, ल, व, ळ, ळ, र, न. ह्यावरून दिसून येईल कीं, क–वर्ग, च–वर्ग हे मराठींतील पांच वर्ग त्यांतील आद्यन्त तेवढे तमिळमध्यें आहेत. म्हणजे पंचवीस ऐवजीं दहा; पोटफोडचा शेंडीफोडचा, कंबरमोडचा ष, श, स नाहींत आणि शेवटचे ह, क्ष, ज्ञ नाहींत. आतां **ग्रंथलिपी** म्हणून ज, श, ष, स, ह हीं अक्षरें घेतलीं आहेत. तमिळी लिपीचा नमुना स्वतंत्र दिला आहे.

## तमिळ राष्ट्रगीत—

।। श्रीः ।।

वाळिय शेन्दमिळ् वाळ्ह नट्रमिळर् ।

वाळिय भारत मणित्तिरुनाडु ।

वन्दे मातरम्, वन्दे मातरम्, वन्दे मातरम् ।।

अर्थ—शुद्ध तमिळ भाषा चिरायु होवो । थोर व उत्तम तमिळ लोक चिरायु होवोत । जगांतील रत्नासारखा व पवित्र भारत देश चिरायु होवो ।। मातृभूमीस त्रिवार वन्दन.

एकंदरींत हा ग्रंथ व्यवहारदृष्टचा अत्यंत उपयुक्त, सारस्वतदृष्टचा अभिनव, आणि राष्ट्रीयदृष्टचा एक बारीकशी घरापुरती कामगिरी करणारा म्हणून संग्राह्य आहे.

भा. इ. सं. मं.
पुणें २.
१।८।६१ टिळक स्मृतिदिन.

**शंकर नारायण (वत्स) जोशी.**

# तमिळ मूळाक्षरें

## स्वर :

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ | आ | इ | ई | उ | ऊ |
| அ | ஆ | இ | ஈ | உ | ஊ |
| ऍ | ए | ऐ | ऑ | ओ | औ |
| எ | ஏ | ஐ | ஒ | ஓ | ஔ |

## व्यंजनें :

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| क | ङ | च | ञ | ट | ण |
| க | ங | ச | ஞ | ட | ண |
| त | न | प | म | य | र |
| த | ந | ப | ம | ய | ர |
| ल | व | ऴ | ळ | र | न |
| ல | வ | ழ | ள | ற | ன |

## ग्रंथाक्षरें :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ज | स | ष | ह | क्ष |
| ஜ | ஸ | ஷ | ஹ | க்ஷ |

# मराठी—तामिळ लघु शब्दकोष

श्री

**श्री;** तिरु — **श्री गणेश प्रसन्न;** कडवुळ् तुणै.

## अ

**अंक (आंकडे);** एण्, एणगळ्.
**अंक (मासिकाचा वगैरे);** इदळ्.
**अकस्मात;** दिडीर्नु.
**अंकुर;** मुळै.
**अंकुर फुटणें;** तुळत पोचु, मुळै विडरदु.
**अक्कल;** बुद्धि.
**अक्कलवान;** बुद्धिशाली.
**अखेर;** कडशी, कडशीले.
**अग (संबोधन);** अडी.
**अंग;** उडंबु.
**अंगधुणें;** कुळिक्करदु.
**अंगांत येणें;** आवेशं वरदु (देव), पिशाशु पिडिच्चिरुक्कु (भूत अंगांत येणे).
**अंगाबाहेर टाकणें;** (पोरुप्पै) तट्टिक्कळिक्करदु.
**अंगठा;** कट्टै विरल्.
**अंगठी;** मोदिरम्.
**अंगण;** वाशल्, वायिल्.
**अगणित;** येगपट्ट.
**अगत्य;** उपचारम्.
**अगदी, नुसतें;** ओरेऽ.
**अग्रलेख;** तलैयंगम्.
**अग्रस्थान;** अग्रतांबूलम्, मुदल् तांबूलम्.
**अंगारा;** विभूति.
**अंघोळ;** कुळियल्.
**अंघोळ करणें;** कुळिक्करदु.
**अचानक;** येदिर पारादडु.
**अजब, अद्भुत;** अतिशयम्.
**अजगर;** मलैप्पांबु.
**अजागळ;** पन्नाडै.
**अजाण;** अरियादवन्.
**अजीबात;** कोंजम्कूड.
**अंजीर;** अत्तिप्पळम्.
**अजून;** इन्नुम्.
**अटक करणें;** कैदु शेय्यरदु.
**अडकित्ता;** पाक्कुवेट्टि.
**अडकविणें;** माट्टरदु.
**अडकवून ठेव;** माट्टि वै.
**अडकून पडणें;** (वळिले) माटिण्डु तिण्डाटवदु.
**अडचण;** तोल्लै, यडंजल्.
**अडणें, अडून बसणें (जनावर वगैरे);** शंडितनम् पण्णदु.
**अडत्या;** तरगन्.
**अडथळा;** तडै.

**अडथळा आणणें;** तडुक्किकरदु.
**अडदांडपणा;** कोट्टम्.
**अडदांडपणा घालविणें, नाहींसा करणें;** कोट्टत्ते अडक्करदु
**अडविणें;** तडुक्करदु.
**(वाट) अडवून बसणें;** ( वळियै ) अडैच्चिण्डु (कि मरच्चिडु) उक्कारंदु.
**अडाणी;** अरियादवन् अरिविल्लादवन् मुट्टाळ्.
**अडुळसा;** आडातोडै.
**अंडें;** मुट्टै.
**अंडें उबविणें;** अडै कात्तल्.
**अडोसा;** मरैवाग.
**अणकुचीदार;** कूर्मै.
**अंतर;** दूरम्, इडैवेळि.
**अंतर (भेद);** वित्यासम्.
**अतिरेक;** ओरेऽडिया.
**अतिशय, खप;** रोंब, प्रमादमा.
**अतिशय वाईट मनुष्य;** रोंब मोशमान आळ्.
**अतिशयोक्ति करून सांगणें;** प्रमाद पडति सोल्रदु.
**अतुलनीय;** ईडु इणैयिलै.
**अतोनात;** येगपट्ट.
**अंत्यक्रिया;** कर्मांतरम्.
**अत्यवस्थ;** अत्यावस्थै, रोंबकायला.
**अंथरणें;** विरित्तल्.
**अथवा;** अल्लदु.
**अद्‌भुत;** अतिशयम्.
**अदमास, अंदाज;** सुमार, निदानम्.
**अंदाजानें;** सुमारा, उद्देशमाग.
**अदृश्य होणें;** मरंजुपोरदु.
**अद्दल घडविणें;** वळि वैक्किरदु.

**अंधळी कोशिंबीर;** कण्णै कट्टि विळ्याड्रदु कण् कट्टि विळैयाट्टु
**अंधार;** इरुट्टु.
**अधाशी;** पेराशै.
**अधिक, थोडें जास्त;** इन्नुम्, कूड, कुडदल्.
**अधिकार;** नाटाण्मै.
**अधू;** मन्दम्, ऊनम्.
**अंधेरी (कमी उजेडाची जागा वगैरे);** मंगलाग.
**अध्यक्ष;** तलैवर्.
**अननस;** अनास पळम्.
**अनपेक्षित;** येदिर्पारादे.
**अनशेपोटी;** वेरुवयिरु.
**अनाथ;** अगति, नादियिल्लादे.
**अनुभव;** अनुभवम्.
**अनुक्रमें;** वरिशैयाय्.
**अनुकरण;** पिन्पट्टुदल्.
**अनुरूप;** पोरुत्तम्.
**अनेक;** पल, अनेक.
**अनेक प्रकार–तऱ्हा;** पलविधमान, पलप्रकारम्.
**अन्न;** शापाडु.
**अन्नान्न करणें, अन्नान्न दशा होणें;** शोत्तुक्कु परक्करदु.
**अन्नाशय;** इरेप्पै.
**अनुमोदन देणें;** आमोदिकरदु.
**अनुराग;** परिवु.
**अनुरूप, योग्य;** तगुंदपडि.
**अन्य, इतर;** वेरे, वेट्टु, मत्त.
**अन्याय;** अन्यायम्.
**अपचन;** अजीर्णम्.
**अपयश, अपेश;** तोलवि.
**अपवाद;** विदिविलक्कम्.
**अपस्मार (फिट);** वलिप्पु.

**अपहार करणें;** अपकरिकरदु.
**अपाय;** अबायम्.
**अपुरें;** कुरैवु.
**अपेक्षा;** येदिर् पार्त्तल्.
**अफवा, कंडचा;** अपवादम्.
**अफू;** अभिनि.
**अंबणें, आंबणें;** पुळ्चि पोरदु.
**अबब;** अडाडा.
**अंबा (कच्चा);** मांगाय्.
**अंबा (पिकलेला);** मांबळम्.
**अंबोटचा (कोवळे बारीक आंबे);** मावडु.
**अंबाडा;** कोण्डै.
**अंबाडी (पालेभाजी);** पुळिच्च कीरै.
**अंबोण;** तीनि.
**अबोली, कोरांटी;** कनकांबरम्.
**अभद्र;** अच्चान्यम्.
**अभिनंदन;** वाळ्तु, पाराट्टु.
**अभ्यास;** पडिप्पु.
**अभ्यास करणें;** पडिक्ककरदु.
**अभ्रक;** अभ्रकम्, मैका.
**अभ्रा;** तल्गाणि उरै.
**अमका;** यारो ओरुवन्.
**अमली पदार्थ;** लागिरि पदार्थम्, लागिरि वस्तु.
**अंमळ;** कोंजम्, शत्त.
**अरण्य;** काडु.
**अरुंद;** कुरुगल्.
**अरेरे, अरे दैवा;** अडप्पावि, अडकडवुळे.
**अर्ज;** मुरैयीडु.
**अवस्था;** अवस्थै.
**अशा रीतीनें–प्रकारें–तऱ्हेनें;** इन्द विदम्, इन्द मुरले, इन्द मादिरि
**अर्थात्;** कट्टायम्.

**अर्धा;** पादि.
**अर्वाच्य, वात्रट, उनाड;** अरट्टै, अरट्टल्.
**अलिप्त;** विलघि.
**अवघड;** कडिनम्.
**अवजड;** भारमान.
**अवधूत, दिगंबर, नग्न;** निर्वाणम्.
**अवर्णनीय;** प्रमादमा, सोल्ल मुडियादपडि.
**अवलंबणें, अवलंबून;** पोरुत्तु.
**अवसडणें (भाजी), खालींवर करणें;** वदक्करदु.
**अवेळ, भलती वेळ;** वेळै यत्त वेळै.
**अव्यवस्थित, अस्ताव्यस्त;** अलंगोलम्
**अवश्य;** अवश्यम्.
**अवस्था;** अवस्थै
**अशा रीतीनें–प्रकारें–तऱ्हेनें;** इन्द. विदम्, इन्द मुरैले, इन्द मादिरि.
**अशिक्षित;** पडिक्यादवन्, पडिक्काद.
**अश्रु;** कण्णीर.
**अश्लील;** आबासम्.
**असभ्य;** कन्नापिन्ना, कंडपडि.
**असा–शी–सें;** इंदमाद्रि, इप्पडि.
**अशी संधि घालवूं नका;** इन्द संदर्भ नलुवविडार्देगळ्.
**असतें, आहे;** उण्डु.
**असे ना कां ?** इरुंदायेन्न ?
**असेल;** इरुकुम्, इरुकलाम्.
**असणार नाहीं;** इरुक्कादु.
**असूं दे ना ?;** इरुक्कट्टमे.
**असूं दे, बरें आहे;** इरुकट्टम्, आवटम्.
**अस्वल;** करडि.
**अस्सल;** असल्.
**अहवाल;** आरिक्कै.
**अहेर;** परिशु, वेगुमदि.
**अळकुडचा;** शेपंकिलंग.

**अळघा;** पुळु.
**अळू;** शेपंकीरै.
**अळें (झाडाभोंवती केलेलें);** कुळि.
**अळें करणें;** कुळि वेट्टदु.
**अक्षता;** अक्षतै.
**अक्षर;** एळुत्तु.

## आ

**आई;** अम्मा, ताय्, तायार्.
**आई-पोरका;** तायिल्लादे कुळन्दै.
**आई वडील;** तायतन्दै.
**आकडा (अंबाड्यांतील);** कोण्डै ऊसि.
**आकडी;** कोक्कि, तोरडु
**आकर्षण;** कर्वचि.
**आकार;** उरुवम्, वडिवम्.
**आकाश;** वानम्, आगायम्.
**आकाशवाणी;** अशरीरि, वानोळि.
**आखूड;** कुट्टै.
**आखणें;** कोडुक्किळिक्करदु.
**आग;** ती.
**आग होणें;** एरियरदु.
**आगपेटी;** नेरुप्पु पेट्टि, तीप्पेट्टि.
**आगबोट;** कप्पल्.
**आगगाडी;** रैल् वण्डि, पुघै वण्डि.
**आगेंमागें;** मुन्नै पिन्नै.
**आग्रह करणें;** कट्टायप्पडुत्तुदल्.
**आघळणें;** अलशुदल्, अलशरदु.
**आघाडा;** नायुर्वि.
**आचरण;** अनुष्टानम्.
**आचळ;** कांबु.
**आचार;** आचारम्.
**आज;** इन्निक्कि, इन्रु.
**आजकाल, दिवसेंदिवस;** वरवर.
**आजारी;** शीक्का.
**आजोबा;** तात्ता.
**आजीबाई;** पाट्टि आया (+).
**आजीबाईसारखी;** किळविमादिरि.
**आजूबाजूस;** अक्कम् पक्कम्.
**आटपणें;** मुडिक्किरदु, मुडिजुपोरदु.
**आटणें, (गाय, म्हैस, वगैरे);** मरत्तुपोच्चु
**आटलेली (म्हैस, गाय वगैरे);** मुदार
**आटवणें;** कायचुकिरदु.
**आटापिटा, यातायातीचें काम;** मेनक्केडु.
**आठवडा;** बारम्.
**आठवडा (गेला);** पोन वारम्, शेन्द वारम्.
**आठवडा (येता);** अडुत्त वारम्.
**आठवण;** निनैवु, ज्ञापकम्.
**आठवण करणें;** निनैवु मूट्टदु.
**आठळी;** पलाकोट्टै.
**आठ्या घालणें;** नेत्तियै (किं. मुगत्तै) शुळुक्करदु.
**आड (दृष्टीआड);** मरैवाग्.
**आडवा;** कुरुक्के.
**आडवा उभा;** कुरुक्कुम् नेडुक्कुम्.
**आढळणें, दिसणें;** तेन्पडरदु.
**आण;** कोंडा, कोंडु वा.
**आणवणें, मागविणें;** वरवळैक्किरदु.
**आणखी;** इन्नम्.
**आणि;** वुम्. (**हा आणि तो;**) इव. नुम् अवनुम्)-
**आंत;** उळ्ळे (**आंत एक बाहेर एक असें नाहीं;** ओळिवु मरव इल्लै)

**आततायी**; आंगारम्.
**आंतल्या गांठीचा मनुष्य**; नेंजु अळुत्तमान आळ.
**आतां**; इप्पो.
**आतांपर्यंत**; इदुवरक्कुम्, इत्तोडु (×)
**आतडीं**; कुडल्.
**आते, आत्या**; अत्तै.
**आतेचा नवरा**; अत्तिम्बेर
**आतेबहीण**; अत्तंगाळ्.
**आतेभाऊ**; अत्तान्.
**आंदण**; शीर वरिशै, वरिशै.
**आदर**; मदिप्पु, मर्यादै.
**आदरातिथ्य**; उपचारम् विरुन्दु शेय्यरदु.
**आदर्श**; नल्ल उदाहरणम्.
**आदला दिवस**; मुदल् नाळ्, मुंदिन नाळ्.
**आधण**; पोरि.
**आंधळा**; कुरुडन्.
**आधार**; आदरवु.
**आधीं**; मुन्ने, मुदलिल्
**अधीन असणें**; अडुत्तु इरुत्तल्.
**आनंद, आवडणारें कार्य**; संतोषम्, कळिप्पु, इन्बम् (×)
**आनंदाच्या उकळ्या फुटणें, आनंद मावेनासा होणें**; आनंदकरैपुरंदु.
**आनुवंशिक**; परंपरयाग.
**आपटणें**; अडित्तल्.
**आपण (बहुमानार्थी तुम्ही या अर्थी)**; तांगळ्.
**आपला—ली—लें**; नम्मुडैय, नम्म, नम्बळदु.
**आपल्याकडे**; तंगळ इडम् (×)
**आपलीच टिमकी वाजविणें**; तन्नुडय तंबटम् अडिचिकरदु.
**आपल्याशींच**; तन्नोडेये
**आपापला**; अवरवर, अवंग अवंग (×)
**आपापसांत**; अवर्गळुक्कुळ्ळेये, तंगळुक्कुळ्ळेये.
**आपोआप**; ताने तानाग.
**आप्त**; आप्तमान, सोंदक्कारन्.
**आफत**; आबत्तु, तिंडाट्टम्.
**आंबट**; पुळिप्पु.
**आंबविणें**; पुळिक्क वैक्करदु.
**आंबूस**; शळप्पु.
**आंबेहळद**; मांगाइंजि.
**आभार**; वाळत्तु.
**आभार मानणें**; वाळ्तरदु.
**आभाळ**; मप्पु, मब्बु.
**आमजनता, सर्व लोक**; पोदु मक्कळ्.
**आमटी**; सांबार.
**आमंत्रण**; अळैप्पु.
**आमसूल**; कोडक्का पुळि.
**आम्ही**; नांगळ्.
**आयाळ**; पिडरि मयिर.
**आयुधें**; करुविघळ.
**आयुष्य**; वाळ्क्कै, जीवनम्.
**आरडा ओरडा, कलगा**; गलाटा, ओशै.
**आरती**; कर्पूरारती.
**आरंभ**; आरंभम्.
**आरंभलें**; आरंभित्तदु.
**आरवणें**; कूवरदु.
**आरसा**; कण्णाडि.
**आरामशीर**; वसतियाग, वसतियान.
**आरास**; अलंकारम्.
**आरोग्य**; आरोग्यम्.
**आरोप करणें**; **दूषण देणें**; तूट्टुदल्.
**आरोपी**; कुटं शाट्टपट्टवन्.

**आर्जव करणें; मिनतवारी करणें;** येडतु सोल्रदु.
**आलें गेलें;** वरवंग पोरवंग, वरवा-पोरवा.
**आलिंगन देणें;** अणैकिरदु, अणैच्छु-[क्किरदु.
**आलें;** इंजि.
**आंव;** वयत्तु पोक्कु.
**आवड;** विरुप्पम्, इष्टम्.
**आव आणणें;** नडिक्करदु.
**आवडणें;** पिडिकरदु.
**आवडीनें;** प्रियमाग, आवलाग.
**आवश्यकता;** आवश्यम्.
**आवळा;** ने ल्लिक्काय्.
**आवळणें; आक्रसणें;** सुरुंगिक्करदु.
**आवाज;** शब्दम्, कुरल् वोळि.
**आवाज बसला;** तोण्डै कट्टिपोच्छु.
**आवेश;** वीरावेशम्.
**आशा;** आशै.
**आशीर्वाद;** आशीर्वादम्, वाळ्तु.
**आश्वासन;** वाक्कु.
**आसपास;** अंगे इंगे.
**आहार;** आहारम्.
**आहे;** इरकदु, उण्डु.
**आहारणें;** इरै येडत्त, पांबु पोले.
**आळ;** कुट्रचाट्टु, अबांडम्.
**आळविणें;** मनमुरुगि (किं. मनकि-शिदु) वेण्ड्रदु.
**आळस;** शोंबल.
**आळशी;** शोंबेरि.
**आळा घालणें;** तिरप्परदु.
**आळीव;** आळिवेरे.
**आज्ञा;** कट्टळै, उत्तरवु.
**आज्ञाधारक;** उत्तरवु पडि नडप्पवन्.

## इ, ई

**इकडे, इथे;** इंगे
**इकडे तिकडे;** इंगे अंगे.
**इंच;** अंगुळम्.
**इच्छा;** आसै, विरुप्पम्.
**इच्छा (शेवटची);** कडशी आसै, कडशी विरुप्पम्.
**इजा;** कायम्.
**इतका;** इव्वळवु
**इतक्यांत;** इदर्कुळ, अदक्कुळ्ळे.
**इतर;** मत्तपेर्, मट्रवर् (×)
**इतिहास;** इतिहासम्, चरित्रम्. वरिलास, इतन उण्डु.
**इत्यादि;** मुदलिय
**इत्यादि तऱ्हा प्रकार;** मुदलियवै.
**इथून;** इंगेइरुन्द्र.
**इथपासून;** इदिलिरुन्दु.
**इंद्रधनुष्य;** वान्विल्.
**इंद्रिय;** इंद्रियम्.
**इमारत;** कट्टडम्.
**इयत्ता;** वघुप्पु.
**इरेस पेटणें;** पोट्टि पोडरदु.
**इलाज;** वळि.
**ईश्वर;** कडवुळ्, आण्डवन्, पेरुमाळ्.
**ईश्वरा!;** कडवुळे, आण्डवने

## उ

**उकडणें (भाजी वगैरे);** वेगवैक्करदु.
**उकडणें (उकाडा होणें);** वियर्करदु.
**उकाडा (रतीब);** वाऽडिक्कै.
**उकरणें;** मण तोंडरदु.

**उकळणें;** कोदिक्करदु.
**उकळी;** कोदि.
**उकळणें; (लुबाडणें);** करक्करदु.
**उकिरडा;** कुप्पैकळम्, कुप्पैमेडु.
**उखळ;** उरल्.
**उखाणा;** विडुकदै.
**उगम;** उर्पत्ति.
**उगवणें;** मुळैक्किरदु. मुळैकिळंबरदु.
**उगाळणें;** इळैकिरदु.
**उगाळून घाल;** इळैचि पोडु.
**उगा रहा;** चुम्मा इरु.
**उगाच;** शुम्मा.
**उगारणें;** ओंगरदु.
**उघडणें;** तिरक्करदु.
**उघड;** तिरन्दुडु
**उघड बोलणें;** पच्चैया पेशरदु, उडैच्चु पेशरदु.
**उघड बोलूं नये त्या—पाचकळ गोष्टी—बोलणें;** पच्चेया पेशरदु.
**उघडा (कपडा न घालतां);** वेरुम् उडंबोडे.
**उघडा ठेव;** तिरन्दु वै.
**उंच;** उयरम्, नेट्टै, उशरमान.
**उचकी;** विक्कल्.
**उचंबळून—ओसंडून—जाणें;** करै पुरुंडु ओडरदु.
**उचल;** तूक्कु, तूक.
**उचलून नेला;** तूक्किण्डु पोइटान्
**उचित;** उचितमान.
**उचित गोष्ट, वाजवी गोष्ट;** मुरैयान विषयम्.
**उच्च;** ओस्ति, उशन्द.
**उच्च दर्जाची स्त्री, राजकन्या, अध्यक्षीण बाई वगैरे;** तलैवि.
**उच्चार;** उच्चरिप्पु.

**उच्चासन;** मेडै.
**उच्छाद;** अमक्कळम्.
**उजवा;** वलदु.
**उजळणें, घांसणें;** तुलकरदु.
**उजाडलें;** विडिंजु पोचु, वेळिचमा पोचु.
**उजेड;** वेळिच्चम्.
**उंट;** ओट्टघम्.
**उटणें;** वासनैप्पोडि.
**उठणें;** येळुंदिरुत्तल्.
**उठणें (झोपेंतून);** विळिच्छुकरदु.
**उठवणें;** येळुप्पुदल.
**उठव;** येंळुप्पु.
**उठवलें;** येळप्पिनेन्.
**उठाठेव, पंचाईत;** वम्बु.
**उडी;** कुदि.
**उडी मारणें (जनावरांनीं वगैरे);** तावरदु.
**उडी मारणें;** कुदिक्करदु.
**उडीद;** उळुन्दु.
**उडदाची डाळ;** उळथम् परुप्पु
**उडणें;** परक्करदु.
**उडविणें (पतंग वगैरे);** परक विडरदु.
**उतणें, उतूं जाणें;** पोंघरदु.
**उतूं गेलें;** पोंघि पोचु.
**उतरणें;** इरंगरदु.
**उतरता;** वाटमा, इरकमान वळी.
**उताणा निजणें;** मल्लांदुकरदु, (माणसांस उद्देशून).
**उताणें असणें;** निमिक्करदु.
**उतारू;** प्रयाणी.
**उतार;** वाटम्, इरक्कम्.
**उत्कर्ष;** मुन्नेट्रम्, उयर्वु.
**उत्कृष्ट;** मेन्मैयान, उयन्दं.

**उत्तम;** तरमान.
**उत्तर (दिशा);** वडक्कु.
**उत्तर (प्रश्नाचें);** बदिल्.
**उत्तर देणें, उलटून बोलणें;** येदर्तु पेशरदु, बदिल् सोल्रदु.
**उत्तेजन देणें;** उत्साह, पडुत्तरदु.
**उत्पन्न होणें;** उण्डाघरदु.
**उत्पन्न;** ऊदियम्, वरुमानम्.
**उत्पन्न (मिळकत;)** अरुवडै.
**उत्पादन (धान्याचें वगैरे);** कण्डुमुदल्.
**उत्साह, जोम;** ऊक्कम्.
**उत्सव, जत्रा;** विळा, तिरुविळा, तिरुनाळ्.
**उत्सुकता;** आर्वम्.
**उत्सुकतेनें, आवडीनें;** आवला.
**उतारा (विषावर वगैरे);** बदील्, माट्ठु (×),
**उथळ;** आळमिल्लाद.
**उदबत्ती;** ऊदुबत्ती
**उदय;** उदयम्.
**उदरनिर्वाह करणें;** पिळैक्किरदु. पोळेक्किरदु, वयट्रपाडु, वयक्रुपोळैप्पु.
**उदार;** उदारमान.
**उदार मनुष्य;** कोडैयाळि.
**उदास, शून्य;** वेरिच्चिनु.
**उंदीर;** येलि.
**उदो उदो करणें;** तूकिवैकरदु.
**उद्घाटन, अनावरण;** अरंगेट्रम्.
**उद्धट;** मुरट्ट.
**उद्धटपणा;** मुरट्टुतनं.
**उद्दाम;** तिमिर्.
**उद्यां;** नाळैक्कु.
[illegible] आळुम्पाळुम्.

**उधार;** कडन्.
**ऊन पाणी;** वेन्नीर, शूडुतण्णि.
**उनाड, उठवळ;** ओडुकालि.
**उनाडक्या करणें;** तारुमारा शेय्यरदु, एरुमारा शेय्यरदु.
**उन्हाळा;** वेय्यिल् कालम्, कोडै-कालम्, कोडै.
**उपजीविका करणें;** पोळक्किरदु.
**उपटणें;** कयट्टरदु, पुढिंगरदु, पुढुंगरदु.
**उपटूं का ?;** कयट्टट्टुमा.
**उपडा;** कवुत्तु.
**उपडा वळतो;** कुप्परति क्किरान्.
**उपद्रव;** तुन्वम्.
**उपयुक्त;** उपयोगमान.
**उपयोग;** प्रयोजनम्.
**उपयोगांत नसलेला, नुसता पडून राहिलेला;** वीणा किडक्कर.
**उपद्रव;** तोन्दरवु, हिम्सै, यडंजल्:
**उपरणें;** अंगवस्त्रम्, मेल्वेष्टि.
**उपरसळी;** नन्नारिवेर.
**उपरा, दुसरीकडून आलेला, परकी;** अशलूर कारंग.
**उपवर मुलगी;** तिरंड पेण्, पेरिशान पेण्.
**उपसणें;** इरैक्किरदु.
**उपाध्याय;** पुरोहित.
**उपास;** पट्णी, उपवासम्, व्रतम्.
**उपाशी;** पट्टणियाग.
**उबविणें (अंडीं);** अडैकाक्करदु.
**उंबर, अंजीर;** आत्तिक्का, आत्तिप्पळम्.
**उंबरठा;** वाशप्पडि.
**उभा;** नेडक्कु.
**उभा ठेव;** निक्क वै.
**उभा रहा;** निल.

